जमीनीच्या वापरात बदल (अकृषिक) करण्यासंदर्भातील सर्व अर्जदारांची माहिती आणि त्यासंदर्भातील टप्पेनिहाय प्रक्रिया जिल्हाधिकारी कार्यालयाच्या अधिकृत संकेतस्थळावर वेळोवेळी प्रसिध्द करणे..

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग,
शासन परिपत्रक क्र. आश्वासन ०६११/प्र.क्र. १२/ल-५,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. २७ जुलै, २०११

संदर्भ:- १. शासन परिपत्रक क्र. एनएपी १०८८/प्र. क्र.१२७५/ल-२, दि. १२.१०.१९८८
२. शासन परिपत्रक क्र. एनएपी १००१/प्र. क्र. ३४/ल-२, दि. १३.११.२००१
३. शासन परिपत्रक क्र. एनएपी १००७/प्र. क्र. ८२/ल-५, दि.१.१.२००८

परिपत्रक:- महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मधील तरतुदींनुसार जमीनीच्या वापरातील बदल (अकृषिक) परवानगी देण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना दिलेले आहेत. जमीनीच्या वापरातील बदलाबाबत अर्जदाराचा अर्ज प्राप्त झाल्या दिनांकापासून किंवा अर्जदारास पोच दिल्याच्या दिनांकापासून ९० दिवसांच्या कालावधीमध्ये, सदरहू वापरातील बदलाबाबत निर्णय घेणे जिल्हाधिकारी यांना बंधनकारक ठरविले आहे. याप्रमाणे कार्यवाही न झाल्यास, अर्जदारास जमीनीच्या वापरातील बदलास आपोआप परवानगी मिळाली असे गृहित धरण्यात यावे अशी तरतुद अधिनियमामध्ये करण्यात आली आहे. जमीनीच्या वापरातील बदलाबाबत परवानगी देताना वापरावयाच्या प्रचलित पध्दतीमध्ये सुधारणा करणेसंदर्भात शासनाने संदर्भाधीन शासन परिपत्रक दि. १२ ऑक्टोबर, १९८८, दि. १३.११.२००१ आणि दि. १.१.२००८ अन्वये वेळोवेळी सुधारणा आणि प्रक्रिया विहीत कालावधीमध्ये पार पाडण्यासंदर्भात कार्यपध्दती सूचित केलेल्या आहेत. असे असतानाही जमीनीच्या वापरातील बदलाबाबत मोठया प्रमाणामध्ये प्राप्त होणारे अर्ज, अपुरे मनुष्यबळ, विविध विभागांचे ना-हरकत प्रमाणपत्र मिळणेस लागणारा कालावधी तसेच जमीनीच्या मालकी हक्कानुषंगाने निर्माण होणाऱ्या समस्या यामुळे काही प्रकरणांमध्ये विहीत कालावधीमध्ये निर्णय घेण्यास अडचणी निर्माण होतात. अशा दप्तर दिरंगाईमुळे आणि संबंधित अर्जदारास त्यांच्या अर्जाबाबतची वस्तुस्थितीची विचारणा करण्यासाठी शासकीय कार्यालयांमध्ये हेलपाटे मारावे लागत असतात. यामध्ये अर्जदारास मानसिक त्रास, आर्थिक झळ सोसावी लागते तसेच मनुष्यबळ खर्ची पडत असते.

२. ही वस्तुस्थिती विधीमंडळामध्ये निदर्शनास आल्यानंतर, मा. मुख्यमंत्री महोदयांनी अर्थसंकल्पीय अधिवेशन, २०११ या कालावधीमध्ये विधानसभेमध्ये दि. २१.४.२०११ रोजी अंतिम आठवडा प्रस्तावाच्या दरम्यान, बिनशेती परवानगी बाबतची माहिती वेबसाईटवर नमूद करण्यात येईल असे आश्वासन दिलेले आहे.

३. मंत्रालयीन स्तरावर, शासन स्तरावर होणारे सर्व शासन निर्णय, परिपत्रके ही संकेतस्थळावर प्रसिध्द करणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. ही बाब विचारात घेता, जमीनीच्या वापरातील बदलाबाबतची परवानगी देण्यापर्यंतची संपूर्ण टप्प्याटप्प्यानिहाय कार्यवाही संबंधित जिल्हयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करणे याद्वारे बंधनकारक करण्यात येत आहे.

४. याअनुषंगाने, जमीनीच्या वापरातील बदलाबाबतचे अर्ज जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्राप्त झाल्यानंतर अर्जास एक संगणक सांकेतांक द्यावा व सदरहू सांकेतांक व संकेतस्थळाचा पत्ता संबंधित अर्जदाराच्या पोचपावतीवर नमूद करावा. सदर सांकेतांक अर्जाबाबतची टप्प्याटप्प्यानिहाय होणाऱ्या कार्यवाहीबाबतची माहिती संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयातील संगणक कोऑर्डिनेटरला देण्याबाबत संबंधित अधिकाऱ्यांना सूचित करण्यात यावे व त्यांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव करून देण्यात यावी. संगणक कोऑर्डिनेटरने सदरहू माहिती जिल्हयाच्या संकेतस्थळावर वेळोवेळी प्रसिध्द होईल याची दक्षता घ्यावी.

५. वरील आदेशांचे जिल्हाधिकारी यांनी काटेकोरपणे पालन करून सदरचे आदेश संबंधित महसूल अधिकाऱ्यांचे निदर्शनास आणून जमीनीच्या वापरातील बदलाबाबत परवानगी देण्याची कार्यवाही विहित मुदतीत पार पाडावी.

६. सदरहू शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द केले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०७२७१५०६०००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विभागीय आयुक्त
उदयोग, उर्जा व कामगार विभाग,
नगरविकास विभाग
ग्रामविकास विभाग
गृह विभाग
सार्वजनिक बांधकाम विभाग
पर्यावरण विभाग
सार्वजनिक आरोग्य विभाग
गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग
जमाबंदी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
निवडनस्ती, ल-५